राज्यस्तरीय स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समितीसाठी पुनर्गठन.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीओएस १०९७/प्र.क्र. ७६/९७/ स्वासैक-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीखः १५ मे, २०१५

वाचा :-

**शासन निर्णय क्रमांकः सा.प्र.वि., पीओएस-१०९९ /३८५ /प्र.क्र. २२३/९९/ स्वासैक-१, दि.५.१.२००१.**

## शासन निर्णयः-

स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन मंजुरीसाठी आवश्यक असलेल्या निकषांची पूर्तता होत नसलेल्या प्रकरणांत मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन) यांचे स्तरावर निर्णय घेण्यात यावा असा निर्णय शासनाने घेतला आहे. मात्र शासन निर्णय दिनांक ५.१.२००१ नुसार गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीमध्ये मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन) हे सदस्य नाहीत. म्हणून सदर समितीमध्ये मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन ) यांचा सदस्य म्हणून समावेश करुन पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समितीचे पुनर्गठन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) मा. मुख्यमंत्री | - अध्यक्ष |
| २) मा. राज्यमंत्री (सामान्य प्रशासन) | - सदस्य |
| ३) श्री. भिकु दाजी भिलारे (गुरुजी) | - सदस्य सचिव. |

२. सदर नियुक्ती पुढील आदेशापर्यंत चालू राहील.

३. उच्चाधिकार समितीच्या कामाची व्याप्ती पुढीलप्रमाणे राहील.

अ. स्वातंत्र्य सैनिकाचे निवृत्तीवेतन व आर्थिक सहाय्य संबंधीचे प्रलंबित अर्ज व नवीन अर्ज निकाली काढणे

ब. सरकारी यंत्रणेच्या सहाय्याने या अर्जाबाबत चौकशी करणे.

क. शासनाने विहित केलेल्या सवलतींच्याबाबत ज्या प्रकरणामध्ये जिल्हाधिकारी शासनाकडे स्पष्टीकरणाबाबत आदेश मागतात तशा संदर्भावर खुलासा करणे.

ड. भारत सरकारने जाहिर केलेल्या योजनेनुसार स्वातंत्र्य सैनिकांकडून आलेले अर्ज तपासून त्या अर्जासंबंधी केंद्र शासनाकडे पेन्शन मंजुरीसाठी शिफारस करणे.

इ. हुतात्मा स्मारकांसंबंधीचे प्रश्न निकाली काढणे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१५१७०४०६९४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hanmant Jagganath Rasal

Digitally signed by Hanmant Jagganath Rasal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Hanmant Jagganath Rasal
Date: 2015.05.15 17:07:57 +05'30'

(ह. ज. रसाळ)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे सचिव,
४. श्री. भि. दा. भिलारे (सातारा) सदस्य सचिव, स्वा. सै. उ. समिती.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई,
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई,
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११.वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१२.सर्व विभागीय आयुक्त,
१३.सर्व जिल्हाधिकारी,
१४.अधिक्षक, शासकीय परिवहन सेवा कार्यालय, मुंबई,
१५.महासंचालक, माहितीव जनसंपर्क संचानालय, मंत्रालय,मुंबई,
१६.उप सचिव (स्वासैक), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७.उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८.सामान्य प्रशासन विभाग,रोखशाखा (कार्यासन २६)/का.२५, मंत्रालय,मुंबई
**१९.**निवड नस्ती ( स्वासैक-१)